जिल्हा दरसुचीबाहेरील बाबींचे (Non District Scheduled Items) दर मंजूर करतांना सुसूत्रता ठेवणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक:-११/०४/२०१७.

**प्रस्तावना:-**

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, जिल्हा दरसूची मधील समाविष्ठ बाबींच्या व्यतिरिक्त इतर कामे करावयाची असल्यास अशा दरांना स्थानिक पातळीवर दर प्राप्त करुन घेऊन त्यास संबंधित सा.बां. मंडळाचे अधीक्षक अभियंता मंजूरी देत असतात. अशा प्रकारचे दर मंजूर करतांना केवळ स्थानिक बाजारभावाचे दर विचारात घेतल्यामुळे पुरेशी स्पर्धा न होता जास्त दराने कामे होत असण्याची शक्यता नाकारण्यात येत नाही. त्यामुळे ह्यात शासनाचे आर्थिक नुकसान होण्याची शक्यता नाकारता येत नाही. अनेक ठिकाणी असेही लक्षात आले आहे की, एका मंडळाने मान्य केलेले दर सरसकट इतर मंडळाकडे वापरले जातात. त्यामुळे ह्या मंजूरीच्या पध्दतीमध्ये एकसुत्रता आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

ह्यापुढे उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे दरसुचीबाहेरील दर (Non District Scheduled Rates) मंजूर करतांना सार्वजनिक बांधकाम मंडळ कार्यालयांना खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे आदेश देण्यात येत आहेत.

१. नियमित व वारंवार वापरल्या जाणाऱ्या बाबींचे दर जिल्हा दरसूचीमध्ये समाविष्ट करण्यात यावेत.
२. रु.२.०० लक्ष पेक्षा जास्त रकमेची बाब (Single Item) असल्यास त्यास स्थानिक वृत्तपत्रातून जाहिरात देऊन स्पर्धात्मक दर प्राप्त करुन घ्यावेत. एकाच वेळी अनेक बाबींचे काम असल्यास एकाच जाहिरातीमध्ये समाविष्ट करण्यात यावेत.
३. रु.५.०० लक्ष पेक्षा जास्त रकमेची बाब (Single Item) असल्यास त्यास जिल्हा वृत्तपत्रात/ आवश्यकतेनुसार राज्यस्तरिय वृत्तपत्रात जाहिरात देऊन स्पर्धात्मक दर प्राप्त करुन घ्यावेत व त्यास मुख्य अभियंता ह्यांची मान्यता घेण्यात यावी. मुद्दा क्र. २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकाच वेळी अनेक बाबीं असल्यास एकाच वेळी वृत्तपत्रात जाहिरातीसाठी देण्यात यावी.

४. एका सा.बां. मंडळाने मान्य केलेले दर सरसकट इतर सा.बां. मंडळाने कुठल्याही परिस्थितीत वापरु नयेत. तथापि फक्त अभ्यास करण्यापुरता त्याचा मर्यादित वापर करावा व त्या सा.बां.मंडळाने स्वतंत्र कार्यवाही करावी.

५. अत्यावश्यक परिस्थितीत एका सा.बां.मंडळाने मान्य केलेले दर त्याच प्रादेशिक विभागातील इतर सा.बां.मंडळांना वापरायवयाचे असल्यास मुख्य अभियंता यांची मंजूरी घेणे अनिवार्य राहील.

६. ज्याप्रमाणे संपूर्ण महाराष्ट्र राज्यासाठी एकच दरसूची (Common Schedule of Rates) लवकरच अमलांत येणार आहे व ती Web site वर असणार आहे. त्याचप्रमाणे असे जिल्हा दरसूचीबाहेरील (Non DSR Items) बाबींचे दर Web site वर अपलोड करणे अनिवार्य असणार आहे.

वरील सूचनांची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०१७०४१११७२१०२९६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash K Ingole

Digitally signed by Prakash K Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY BLDS, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3e67265689b1060d15b7956db930c838cb8188 45016d02e4d9d24a7fe1f2309, cn=Prakash K Ingole
Date: 2017.04.11 17:24:09 +05'30'

**(प्रकाश इंगोले)**
उपसचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
२. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
३. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग.
४. निवडनस्ती.